
9 नोव्हेंबर 1877
कुकुचकू....
*नूर मोहम्मद*, कुठे आहात दादा? अभिनंदन. तुम्हाला एक गोंडस मुलगा झालाय.

आपण तुझं नाव
*इक्बाल* ठेवू –
*मोहम्म्द इक्बाल.*

वयाच्या चौथ्या वर्षी इक्बाल मदरशात जाऊ लागला, कुराण वाचन शिकण्यासाठी. त्याच्या वडिलांचे विद्वान मित्र, *मीर हसन* एकदा मदरशात आले.





मीर हसन आपल्या मित्राच्या घरी गेले.....

नूर मोहम्मद, फक्त कुराण वाचन शिकणं पुरेसं नाही. मी इक्बालला अरबी भाषा आणि इतर विषय शिकवू शकतो, तुझी परवानगी असेल तर!

आनंदाने. तुमच्यापेक्षा चांगला शिक्षक इक्बालला मिळूच शकणार नाही.



हे एक शेर बटाटे आहेत. मोज ते.

दहा आहेत.

काकीने यातले निम्मे शिजवले, तर किती राहीले?

पाच.

शाब्बास!

मीर हसन इक्बालला शिकवणार, हे नक्की झाले. कित्येकदा त्यांची शिकवणी वर्गाच्या बाहेर होत असे.

नूर मोहम्मद धार्मिक वृत्तीचे होते आणि टोप्या शिवून आपला उदरनिर्वाह करत. एकदा त्यांचा मोठा मुलगा, *अता मोहम्मद* त्यांच्याकडे आला आणि म्हणाला....








मीर हसन यांना *स्कॉच मिशन कॉलेज*मध्ये अरबी भाषेचा प्रोफेसर म्हणून नोकरी मिळाली. त्यांनी इक्बालला त्याच कॉलेजमध्ये प्रवेश मिळवून दिला. अशा प्रकारे, घरच्या धार्मिक वातावरणासोबतच इक्बालला आधुनिक शिक्षणही मिळू लागले. इंटरमिजीएट परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर, त्याने लाहोरच्या गव्हर्नमेंट कॉलेजमध्ये प्रवेश घेतला.

कॉलेज हॉस्टेलमधील इक्बालची खोली मित्रांच्या भेटीचे ठिकाण बनले.




मास्टर्ससाठी इक्बालने तत्वज्ञान हा विषय निवडला. त्याचे प्रोफेसर *थॉमस आरनॉल्ड* यांच्याशी त्याची घनिष्ठ मैत्री झाली.

इक्बाल, तू मुशायऱ्यामध्ये येऊन तुझ्या कविता वाचल्या पाहिजेत.

शाळेत असतानाच इक्बाल कविता करू लागला होता. कॉलेजमध्ये एकदा....

पण मुशायऱ्यांमध्ये मी कविता ऐकवत नाही.

तू आपलीं प्रतिभा लपवून कशाला ठेवतोस?

अल्ला, मला या जुलमी लोकांपासून वाचव.

चल इक्बाल. नाहीतर, आम्ही तुला उचलून नेऊ.

नोव्हेंबर 1895: *हकीम अमिनुद्दीन* यांच्या घरी मुशायरा होता. *अर्शद गोर्गानी* त्याच्या अध्यक्षपदी होते.

(कुजबूज) हा पोरगेला कवी कोण?

*मोती समजून*
*तू गोळा केले*
*पश्चातापाचे अश्रू*
*माझ्या डोळ्यातले*




इक्बाल हे पहिलेच भारतीय कवी होती ज्यांनी राष्ट्रवादाला खतपाणी घातले. सर्व मुस्लीम आणि हिंदू धर्मीय शाळकरी मुले त्यांचे गीत सारे जहाँ से अच्छा....गातात. या गीतात त्यांनी *चिश्ती* आणि *गुरू नानक* हे दोन्ही महात्मे सत्य आणि एकाच ईश्वराचे पुजारी आहेत, असे म्हटले. त्यांच्या *नानक* या कवितेत ते बुद्धाचा महान अध्यात्मिक दर्जाही व्यक्त करतात.




इक्बाल कुणाचा तिरस्कार करत नसे. त्यांनी सगळीकडून उत्तमोत्तम गोष्टी शिकायचा प्रयत्न केला, मग ते हिंदू तत्वज्ञान असो वा पाश्चात्य काव्य वा स्वकियांची शायरी. आपल्या अंतर्मनातील परस्परविरोधी घटकांचा थांग त्यांना लागला होता. आपल्या देशातील लोकांची, विशेषत: मुस्लिमांची परिस्थिती कशी सुधारता येईल, त्यांच्याकडे काय कौशल्ये आहेत असे विचार त्यांच्या मनात येऊ लागले. त्यांना आपल्या क्षमतेचाही अंदाज आला. आपल्या काव्यात आणि भाषणात मोठी ताकद असल्याचे त्यांना जाणवले.

*अंजुमन हिमायत-ए-इस्लाम* ही एक कल्याणकारी संस्था होती. 1900 साली भरलेल्या त्यांच्या सभेत इक्बालने आपली *नाला-ए-यतीम* ही कविता म्हटली. या कवितेने प्रभावित होऊन शेकडो श्रोत्यांनी त्याच्या प्रती विकत घेतल्या. मग अंजुमनच्या दर वार्षिक सभेमध्ये इक्बाल आपल्या कविता म्हणू लागले. लोक त्यांची प्रत्येक कविता विकत घेऊ लागले. यातून गोळा झालेले धन संस्थेच्या कल्याणकारी कार्यासाठी खर्च करण्यात आले.





इक्बाल लाहोरच्या गव्हर्नमेंट कॉलेजमध्ये शिकवत असत. प्रोफेसर आरनॉल्ड यांच्या सल्ल्यावरून इस्लामी तत्वज्ञानामध्ये पीएच.डी. करण्यास त्यांनी लंडनला जायचे ठरवले. पण त्याआधी दिल्लीला जाऊन त्यांनी *निजामुद्दीन औलिया* यांच्या दर्ग्याला भेट दिली. नंतर त्यांनी *गालीबच्या* स्मारकाला भेट दिली. तिथे एक कव्वाल गालिब यांची शायरी गात होता.



*प्रियेच्या गल्लीमध्ये*
*उडतेय माझी राख*
*अखेरीस, नुरली आता*
*जीवनाची आस*

*आता निरंतर तो*
*कैफ ना राहीला*
*जागलो सकाळी तेव्हा*
*स्वप्न ना सोबतीला.*

7 सप्टेंबर 1905 रोजी इक्बाल
इंग्लंडला जाणाऱ्या जहाजात बसले.

इक्बाल लिहितो, “आम्ही सुएझला पोहोचलो, तेव्हा बरेच मुस्लीम व्यापारी त्यांचा माल घेऊन जहाजावर आले. मला त्यांच्याकडून जाजम विकत घ्यायचे होते....”






इक्बालने सुरा म्हणताच, व्यापाऱ्याने त्यांच्या हातांचे चुंबन घेतले.

माशाअल्ला!
अल्ला तुमचे रक्षण करो!

24 डिसेंबर 1905 रोजी इक्बाल लंडनला पोहोचले. पुढल्याच दिवशी ते केंब्रिजला गेले. तिथे *रिसर्च स्कॉलर* म्हणून एका कॉलेजमध्ये त्यांनी प्रवेश घेतला.

इक्बालने आपल्या विषयावर संशोधन करण्यासाठी *म्युनिक* विद्यापीठात नाव नोंदवले. वकिलीच्या परीक्षेची तयारी करताना त्यांना कित्येकदा रात्रीच्या भोजनासाठी लंडनला जावे लागे. तिथे त्यांची भेट *अतिया फैझी* या सुशिक्षित, बुद्धिमान भारतीय स्त्रीशी झाली. इक्बाल आपले लेख त्यांना वाचून दाखवत आणि काहीवेळा *हफीझ*च्या कविता म्हणून दाखवत.








हायडेलबर्ग हे जर्मनीतील एक शांत, सुंदर शहर. इक्बाल तिथे चार महिने राहिले आणि जर्मन भाषा शिकले. आपले शिक्षक आणि मित्रांसोबत ते तिथे फिरले, त्यांनी नावेतून नदीची सैर केली, गाणी गायली आणि मित्रांसोबत गप्पा मारल्या. *एम्मा वेगेनास्त* या त्यांच्या जर्मन भाषेच्या शिक्षिका होत्या. त्यांनी इक्बालला जर्मन साहित्य, विशेषत: *गटे*, तसेच जर्मन तत्वज्ञान यांचा परिचय करून दिला.



त्या काळी, जर्मन साहित्यावर पौर्वात्य काव्याचा बऱ्यापैकी प्रभाव होता. इक्बालवर जर्मन कविंची, विशेषत: गटेची, चांगलीच छाप पडली.



*नेकार* नदीच्या काठी बसून इक्बालने त्यांची *एक सायंकाळ* ही पहिली कविता लिहिली. ती त्यांच्या *बांग-ए-दारा* या काव्यसंग्रहाचा भाग आहे.

किती सुंदर आहे ही शांतता!

गटे! ते जिवंत असते तर मी त्यांना भेटू शकलो असतो. त्यांच्या कल्पनांची झेप अफाट होती, या अगणित चांदण्यांसारखी!



अतिया फैझी इक्बालला भेटायला हायडेलबर्गला आल्या. तिथे त्या इक्बालच्या मित्रपरिवारामध्ये लोकप्रिय झाल्या. त्या तिथून निघाल्या तेव्हा सर्वांनी त्यांच्यासाठी एक सहल आयोजित करून निरोपाचे गीतही म्हटले.




नोव्हेंबर 1907 मध्ये इक्बालला म्युनिक विद्यापीठातून पीएच्.डी. मिळाली. मग ते लंडनला परतले आणि इस्लाम व इस्लामी संस्कृतींवर व्याख्याने देऊ लागले. तिथे कित्येक मुस्लीम विद्यार्थ्यांना ते भेटले.
लंडनला इक्बालने कायद्याची परीक्षाही दिली. त्यांनी त्यांची पहिली पर्शियन भाषेतील गझल लंडनमध्येच लिहीली. इक्बालच्या बऱ्याच कविता पर्शियन भाषेत आहेत.



इक्बाल लंडनमध्ये होते त्याच काळात डिसेंबर 1906 मध्ये ढाका येथे *ऑल इंडिया मुस्लीम लीग*ची स्थापना झाली. *आगा खान तृतीय* हे त्याचे अध्यक्ष बनले. इक्बाल ऑल इंडिया मुस्लीम लीगच्या ब्रिटीश समितीचे सदस्य बनले. या काळात इक्बालने इस्लाम धर्माच्या इतिहासाचा सखोल अभ्यास केला.





*कोणती कहाणी दडलीय*
*तुझ्या अवशेषांमध्ये*
*काय गूढ आहे मौन*
*मनाच्या कोशांमध्ये*
*निस्तेज चित्र रंगवून*
*पुनर्जिवीत कर*
*पूर्वजांची कथा माझ्या*
*नसानसांत भर*

बॅरिस्टर बनल्यावर इक्बाल घरी परतले. त्यांचे जहाज सिसिली बेटाजवळ आले. या बेटावर मुस्लिमांनी 200 वर्षे राज्य केले होते. त्याचे स्मरण झाल्यावर इक्बालला रडू आले.




1908 साली भारतात परतल्यावर, इक्बालला लाहोरच्या गव्हर्नमेंट कॉजमध्ये तत्वज्ञान आणि इंग्रजी साहित्याचा प्रोफेसर म्हणून नियुक्त केले गेले. त्याचवेळी, त्यांनी पंजाब उच्च न्यायालयात वकिलीही सुरू केली. इक्बाल हे एक चांगले शिक्षक होते. त्यांचे आपल्या विद्यार्थ्यांशी फार जिव्हाळ्याचे आणि मित्रत्वाचे नाते होते.

इक्बाल आपले काव्य आणि विद्वत्ता यांसाठी प्रसिद्ध होते. भारतभरच्या विद्यापीठांतून त्यांना व्याख्यान देण्यास निमंत्रित केले जात असे. अलीगढ, पंजाब, अलाहाबाद येथील विद्यापीठे तसेच हैद्राबादचे उस्मानिया विद्यापीठ यांनी त्यांना सन्माननीय *डि.लीट्.* पदवी प्रदान केली. इक्बालला अनेक मुस्लीम, ख्रिश्चन आणि हिंदू मित्र होते. त्यांतील एक होते, *मिर्झा जलालुद्दीन.* त्यांचा नोकराकडून *हाली*च्या कविता ऐकायला इक्बालला फार आवडत असे. *मुसद्दस* प्रकारच्या या कवितांमध्ये मुस्लिमांच्या इतिहासाचे वर्णन असे.





*सर्व जुलमांचा करून अंत*
*सर्व जमातींचा घडवून मिलाप*
*अवतरला वारस हिराचा*
*या लोकांना भेटण्यास खास*

कधी-कधी मिर्झा जलालुद्दीनच्या घरी संगीत मैफील भरत असे. इक्बालला संगीत आवडत असल्यामुळे ते तिथे जात असत. पण 1913 नंतर ते क्वचितच अशा मैफिलींना हजर राहिले.



इक्बालचे लहान वयातच *करीम बी* सोबत लग्न झाले. त्यांना दोन मुले झाली: *आफ़ताब इक्बाल* आणि *मेराज बेगम*. पण करीम बी आणि इक्बाल हे एकमेकांना अनुरूप नव्हते. त्यांचा घटस्फोट झाला. त्यांची दुसरी पत्नी, *मुख्तार बेगम* हिचे तरूण वयातच निधन झाले. इक्बालने 1913 साली *सरदार बेगम*शी लग्न केले. त्यांना दोन मुले झाली: *जावेद इक्बाल* आणि *मुनिरा बेगम*.



याच काळात युरोपीयन देशांनी तुर्कस्थान, इराण, लिबिया आणि मोरोक्कोसारख्या देशांवर कब्जा केला. भारतीय मुस्लीम मागासलेले आणि कमी शिकलेले होते. नशीबाचा कल मुस्लिमांच्या बाजूने नाही, असे इक्बालला वाटू लागले. अशा परिस्थितीत, त्यांनी *शिकवा* ही कविता लिहीली. या कवितेत ते देवापाशी गाऱ्हाणे मांडतात. अंजुमन हिमायत-ए-इस्लामच्या सभेत इक्बालने ही कविता म्हटली.




काही धार्मिक लोकांनी या कवितेला नाके मुरडली. त्यांच्या मते, अल्लाकडे कधी तक्रार करायची नसते आणि इक्बालने आपल्या कवितेद्वारे नेमके तेच केले. नंतर त्यांनी *शिकवा* कवितेचे उत्तरही लिहीले. या कवितेतील प्रत्येक शेरचा लिलाव झाला. यातून गोळा झालेला पैसा बाल्कन युद्धातील तुर्की निर्वासितांच्या मदतीसाठी पाठवण्यात आला.

1922 साली एक ऐतिहासिक घटना घडली. लाहोरमधील एका मोकळ्या जागेवर हिंदूंना मंदिर बनवायचे होते आणि मुस्लिमांना मशीद. इंग्रज न्यायाधीशाने दुसऱ्या दिवशी ती जागा पाहायचे ठरवले. ब्रिटिशांच्या राज्यात, धार्मिक स्थळ तोडण्यास मनाई होती. हा विचार करून शेकडो मुस्लिमांनी रात्रभरातच त्या जागेवर एक मशीद उभारली. इक्बालने या प्रसंगावर एक प्रसिद्ध कविता लिहीली.




1923 साली ब्रिटीश सरकारने इक्बालला *सर* पदवीने सन्मानित केले. हा सन्मान स्वीकारण्यासाठी इक्बालने त्यांचे शिक्षक *सईद मीर हसन* यांना *शमसुल उल्मा* हा किताब देण्यात यावा, अशी अट घातली.





जेव्हा इक्बालने सारे जहाँसे अच्छा हे गीत लिहीले तेव्हा त्यांना ठाम विश्वास होता की भारत हा असा देश आहे जिथे हिंदू आणि मुस्लीम एकत्र शांततेने राहू शकतात. पण ब्रिटिश राज्यात, या दोन धर्मीयांमध्ये कलह वाढू लागले. कुणा मुस्लिमाने गाय मारली वा मशिदीजवळ कुणा हिंदूने मोठ्या आवाजात गाणे वाजवले वा दोघांनी एकमेकांची धार्मिक पवित्र पुस्तके जाळली की दंगली होत. अशा परिस्थितीत इक्बालची भूमिका काय असे?
*भारतीयांमध्ये सौहार्द वाढवण्यासाठी प्रयत्न करणाऱ्या प्रत्येकाला माझा पाठींबा आहे,* असे ते म्हणत.

काळ सरू लागला तसे हिंदू-मुस्लीम भारतात एकत्र शांततेने नांदू शकणार नाहीत, असे इक्बालला वाटू लागले. शिक्षण, व्यापार आणि इतर गोष्टींमध्ये मुस्लीम लोक हिंदूपेक्षा खूप मागे पडले होते. इक्बालने मुस्लिमांची उमेद आणि धैर्य वाढवण्यात हातभार लावला. त्यांच्या कवितेने मुस्लिमांना आपल्या चुकांची जाणीव करून दिली तसेच त्या सुधारण्याची प्रेरणाही दिली. निराश मनांना इक्बालने कशी उभारी दिली याचा अंदाज त्यांच्या पुढील शेरांवरून येतो.

*स्वतःला इतक्या उंचीवर ने*
*की खुदा तुला स्वतःहून विचारेल,*
*बोल तुझ्या नशिबात काय लिहू.*
*तू गरूड आहेस*
*उडणं हाच तुझा धर्म*
*अमर्याद आभाळात*
*विहरणं हेच कर्म.*
*सत्य, न्याय, संयम हे धडे*
*गिरव पुन्हा एकवार*
*मग निश्चितच तो करेल तुला*
*या जगाचा सरदार*



इक्बालच्या कवितांचा पहिला संग्रह *पयाम-ए-मशरीक* 1923 साली प्रकाशित झाला. 1924 साली, त्यांचा सर्वाधिक प्रसिद्ध उर्दू कविता संग्रह *बंग-ए-दारा* आला. ते संपूर्ण भारतभर प्रसिद्ध झाले. अगदी गरीब-श्रीमंत सर्व लोकांना त्यांच्या कविता आवडू लागल्या. पण इक्बालला यातून पैसे कमावण्याची लालसा नव्हती. मृत्यूच्या दोन वर्षे आधी त्यांनी त्यांचे एकुलते *जावेद मंझील* हे घर बांधले. आता त्याचे नाव *इक्बाल म्युझीयम* आहे.





ऑटोमनचे खलिफा
अब्दुल मजीद

जगातील इतर मुस्लिमांच्या विपरीत, भारतातील मुस्लीम तुर्कस्थानच्या खलिफाला पाठिंबा देण्यासाठी एक चळवळ चालवत होते. भारत हा इस्लामसाठी *दार-उल-हर्ब* किंवा शत्रु प्रदेश घोषीत करण्यात आला होता. मुस्लिमांना भारत सोडून अफगाणिस्तानमध्ये जाऊन वसण्यास प्रोत्साहन देण्यात येत होते. हजारो मुस्लीम लोक तिथे गेले, पण आपले सर्व काही गमावून ते परतले. इक्बाल या चळवळीतून बाहेर पडले, कारण ती त्यांना मुस्लिमांच्या हिताची वाटली नाही. तुर्कस्थानच्या *केमाल अतातुर्क* यांनी खलिफापद रद्द केल्यावर ही चळवळ थंडावली.



मुस्तफा केमाल
पाशा, अतातुर्क



भारतात स्वातंत्र्याची चळवळ सुरू होती. पण मुस्लीम आर्थिक तसेच शैक्षणिकदृष्ट्या दुर्बल होते. मुस्लीम शासकांनी गमावलेल्या सत्तेचे त्यांना दुःख होते. इक्बालने त्यांचा स्वाभीमान आणि आत्मविश्वास परत मिळवून देण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या मते, मुस्लिमांनी राजकारणात भाग घेऊन आपल्या हक्कांचे संरक्षण करायला हवे. 1926 साली, इक्बाल *पंजाब लेजिस्लेटीव्ह काऊंसील*ची निवडणूक लढले आणि सदस्य म्हणून निवडून आले.

इक्बालला पंजाब प्रांताच्या मुस्लीम लीगचे सचिव बनवण्यात आले. 1927 साली ब्रिटीश सरकारने सायमन कमिशनची स्थापना केली. ती भारतीय राज्यघटनेत सुधारणा करण्याबाबत विचारविनिमय करणार होती. कमिशनमध्ये एकही भारतीय प्रतिनिधी नव्हता. त्यामुळे काँग्रेसने त्यावर बहिष्कार टाकला. मुस्लीम लीगमध्ये दोन मतप्रवाह होते. *केंद्रीय मुस्लीम लीग*चे अध्यक्ष *जीना* आणि *मौलाना मोहम्मद अली* यांनीही कमिशनवर बहिष्कार टाकला. पण *पंजाब मुस्लीम लीग*चे अध्यक्ष *मोहम्मद शफी* आणि सचिव इक्बाल यांनी कमिशनला सहकार्य करायचे ठरवले.





सायमन कमिशन अयशस्वी ठरले. वैफल्यग्रस्त ब्रिटीश मंत्री म्हणाले....




सर्व राजकीय पक्षांची एक बैठक बोलावण्यात आली आणि नेहरू रिपोर्ट बनवण्यात आला. तो मुस्लिमांच्या हिताचा नाही, असे म्हणून जिनांनी त्यात दुरुस्त्या सुचवल्या. या दुरुस्त्या स्वीकारण्यात आल्या नाहीत. मग मुस्लिमांना एकजूट होण्याची गरज वाटू लागली. मतभेद मिटवण्यासाठी जिना मोहम्मद शफी यांना भेटले. या काळात समविचारी इक्बाल आणि जिना यांच्यात जवळीक वाढली. पुढे आयुष्यभर इक्बालने जिनांना साथ दिली. इक्बालने जिनांना लिहिलेल्या पत्रांमधून ही बाब अधोरेखित होते.

जिना, इक्बाल आणि मोहम्मद अली यांना मुस्लिमांच्या भविष्याची चिंता होती. त्यामुळे आपापसांतील मतभेद विसरून ते एकत्र राहिले. इक्बाल बौद्धिक पातळीवर कार्यशील असले तरी राजकीय चळवळींमध्ये भाग घेत नसत. एकदा मोहम्मद अली इक्बाल यांना भेटायला आले....




इक्बाल एक महान मुस्लीम तत्वज्ञ आणि कवी म्हणून ओळखले जाऊ लागले. 1929 साली, अलीगढ, मद्रास आणि उस्मानिया विद्यापीठांनी त्यांना व्याख्यान देण्यास बोलावले. ही व्याख्याने त्यांनी इग्रजी भाषेत दिली. त्यांचा संग्रह *इस्लाममध्ये धार्मिक विचारांचे पुनरुत्थान* या पुस्तकात संकलित करण्यात आला आहे.

1930 साली ब्रिटीश सरकारने सर्व राजकीय पक्षांना राज्यघटनेचा आराखडा बनवण्यासाठी निमंत्रित केले. 1930 ते 1932 या दरम्यान तीन गोलमेज परिषदा आयोजित करण्यात आल्या. इक्बालने दुसऱ्या व तिसऱ्या परिषदेत भाग घेतला. डिसेंबर 1930 मध्ये अलाहाबादमध्ये आयोजित केलेल्या मुस्लीम लीग सभेत एक महत्त्वाची घटना घडली. तिथे इक्बाल आपल्या भाषणात म्हणाले....

माझी इच्छा आहे की पंजाब, वायव्य सीमा भाग, सिंध आणि बलुचीस्तान यांचं एकच राज्य करावं.

भारतीय मुस्लिमांच्या उज्ज्वल भविष्यासाठी भारताच्या वायव्येला एक स्वतंत्र मुस्लीम राज्य असलं पाहिजे.

एक मुस्लीम बहुसंख्य राज्य! त्यावेळी काही नावसुद्धा नसलेलं हे राज्य म्हणजे निव्वळ कल्पनाविलास होता.

1931 साली, दुसऱ्या गोलमेज परिषदेत जाण्याआधी इक्बालने दैनिक *इन्किलाब*द्वारे एक संदेश दिला....

मी हिंदू बांधव आणि विशेषत: वृत्तपत्रांना सांगू इच्छितो....

*कडवट बोल टाळा*
*मैत्रीचं नातं पाळा*
*खुदाच आहे तो*
*आपल्याला एकत्र ठेवी जो.*

भारतीय मुस्लीम इक्बालचा आदर करत. केंब्रिजमधील भारतीय विद्यार्थी *चौधरी रहमत अली*, इक्बालच्या भाषणाने प्रभावित झाले. इक्बाल तिसऱ्या परिषदेसाठी लंडनला गेले, रहमत अली आणि त्यांचे मित्र त्यांना भेटले. त्यावेळी इक्बालची तब्येत बरी नव्हती.

सर, आम्ही भारतातल्या मुस्लीम राज्याच्या नावाचा विचार केलाय. *पाकिस्तान*. कसं वाटतं?

पाकिस्तान!

सर, पंजाबमधला प, अफगाणीतला अ, काश्मीरचा क, सिंधचा स, बलुचिस्तानमधला स्तान असं मिळून पाकिस्तान. पवित्र भूमी.

बंगालमध्येसुद्धा मुस्लीम बहुसंख्य आहेत. पण हे नाव छान आहे. पवित्र भूमी! हे नाव एका कागदावर लिहून द्या मला. मी त्यावर थोडा विचार करेन.

इक्बाल तिसऱ्या गोलमेज परिषदेसाठी लंडनला गेले. तिथे जिनादेखील आले होते. खरंतर, त्यांना त्या परिषदेचे निमंत्रण नव्हते. इक्बाल आणि जिना यांच्या लंडनमध्ये अनेक भेटीगाठी झाल्या.








तिसऱ्या गोलमेज परिषदेनंतर, इक्बाल स्पेनला गेले. तिथे मुस्लिमांनी 700 वर्षे राज्य केले होते. तेथील *कोर्डोबा*ची मशीद ही जगातील सर्वात मोठ्या आणि सुंदर मशीदींपैकी एक आहे. अमीर *अब्द-अल्-रहमान* यांनी एका कोसळलेल्या चर्चवर ही मशीद उभारली होती. मुस्लीम स्पेनमधून निघून गेल्यावर मशीद न तोडता त्याच्या आतच एक चर्च बनवण्यात आले. 400 वर्षांमध्ये, इक्बाल हे तिथे नमाज पडणारे पहिलेच मुस्लीम होते. तिथेच त्यांनी *मस्जिद-ए-कुर्तब्द* ही कविता लिहिली.





25 फेब्रुवारी 1933 रोजी, इक्बाल फ्रंटियर मेलने लाहोरला परतले. लाहोर रेल्वे स्टेशनवर हजारो लोक त्यांचे स्वागत करण्यास जमले होते.

1934 साली इक्बालची तब्येत ढासळू लागली. त्यामुळे त्यांनी सक्रीय राजकारणातून निवृत्ती घेतली. पण एक नेता म्हणून त्यांचा प्रभाव ओसरला नव्हता. इक्बालच्या पत्नीची तब्येतही खालवत चालली होती. इक्बालचे मित्र सर *रॉस मसूद* यांनी इक्बालला उपचारांसाठी भोपाळला बोलावले. मसूर हे सर सईद यांचे नातू होते. त्यांची आई इंग्रज होती.




भोपाळमधील प्रसिद्ध हमीदी हॉस्पीटलमध्ये इक्बालवर उपचार करण्यात आले. पण त्याने त्यांच्या प्रकृतीत फारशी सुधारणा झाली नाही. काही काळ तिथे राहिल्यावर ते लाहोरला परतले.



सरदार बेगमची तब्येतही बिघडली होती. त्या आपल्या मुलांची काळजी घेऊ शकत नव्हत्या.

*मुनिरा, जावेद* भांडू नका.

मुलांना इथून न्या. रुग्णाला त्रास देऊ नका.

नको, असू दे त्यांना इथेच. पण भांडू नका दोघं.

सरदार बेगमच्या तब्येतीत सुधारणा होत नव्हती. शेवटी एक दिवस....

*अली बक्ष*, अम्माजानला काय झालंय?

जावेद, तुझी अम्माजान अल्लाला प्यारी झाली. आता तिला कसलाही त्रास नाही.






सरदार बेगमच्या निधनानंतर दोन मुलांची काळजी घेण्यासाठी इक्बाल आयाचा शोध घेऊ लागले. पण कुणी योग्य भारतीय स्त्री त्यांना मिळाली नाही. मग त्यांनी एक जर्मन स्त्री *डोरीस अहमद* यांना नोकरीवर ठेवले. तिने कौटुंबिक वातावरण निर्मिती करून मुलांचे चांगले संगोपन केले. तिच्या इच्छेनुसार मुले तिला *आपाजान* म्हणू लागले.









1937 साली इक्बाल हजला जाण्याच्या विचारात होते. पण त्यांच्या तब्येतीने साथ दिली नाही. त्यांचे मूत्रपिंड निकामी झाले होते. त्यांना अस्थम्याचा त्रास होत होता आणि त्यांनी आवाजही गमावला होता. त्यांचा निष्ठावंत नोकर अली बक्षने त्यांची चांगली काळजी घेतली. त्यांचे मित्र नेहमी त्यांना भेटायला येत. 20 एप्रिल रोजी मुनिरा नेहमीसारखंच त्यांच्या बिछान्यात येऊन त्यांच्या कुशीत शिरली.




21 एप्रिल 1938 रोजी, लाहोरमध्ये इक्बालचे निधन झाले.

इक्बालला मुस्लिमांविषयी प्रेम आणि सहानुभूती होती. पण इतर धर्मियांविषयी त्यांच्या मनात कटुता नव्हती. त्यांचे मुस्लिमांबरोबरच हिंदू, ख्रिश्चन आणि शीख मित्रदेखील होते. ते पूर्वग्रह बाळगत नसत आणि इतरांच्या श्रद्धांचा आदर करत. परंतु हिंदू-मुस्लीम यांच्यातील कलहाचा त्यांना क्लेश होत असे. मुस्लिमांना स्वत:चे राज्य मिळाले तर ते पुन्हा राज्यकारभार करण्यासाठी प्रशिक्षित होतील, असा त्यांचा मानस होता. त्यांच्या मते, इस्लामी तत्वज्ञान स्थायी नव्हते. काळानुसार, इस्लामी कायद्यांमध्ये बदल करणे शक्य होते. आपले हे विचार त्यांनी एका लेखातून व्यक्त करताच त्यांच्या विरुद्ध एक फतवा काढून त्यांना *काफीर* ठरवण्यात आले.

आपल्या मृत्यूपूर्वी इक्बालने काही ओळी लिहून ठेवल्या:

*ते जुनं गीत पुन्हा कुणी गाईल, की नाही?*
*हिजाझची झुळुक पुन्हा वाहील, की नाही?*
*या फकिराचा प्रवास संपत आलाय आता*
*आयुष्याचं गुपीत उलगडण्यास कुणी येईल, की नाही?*



अल्लामा इक्बाल यांची समाधी लाहोर येथील शाही किल्ल्यासमोर बादशाही मशीदीलगत आहे.

त्यांच्या निधनानंतरही त्यांच्या कविता मुस्लिमांच्या मनात उमेद जागवून जातात. इक्बाल सर्वांवर प्रेम करत, पण मुस्लिमांबद्दल त्यांच्या मनात एक विशेष हळवा कोपरा होता. सर सईदसारखंच त्यांनाही, मुस्लिमांनी केवळ धार्मिक क्षेत्रातच नव्हे तर आधुनिक शिक्षणातही उत्तम प्रगती करावी, असे वाटे. प्रत्येक मुस्लीम सुशिक्षित, सक्षम आणि आत्मविश्वासू व्हावा अशी त्यांची इच्छा होती. यामुळे मुस्लिमांवर कुणी अन्याय करू शकणार नाही, अशी त्यांची धारणा होती. ते पाकिस्तानचे राष्ट्रीय कवी होते. रेडिओ आणि टिव्हीवर त्यांच्या कविता बऱ्याचदा ऐकवल्या जातात. पण भारततही त्यांचा आदर केला जातो. त्यांचे गीत *सारे जहाँसे अच्छा हिंदोस्ता हमारा* अनेकदा भारतात ऐकवले जाते.

या पुस्तकात इक्बालच्या मूळ कवितांच्या ओळी नाहीत. कवितांच्या इंग्रजी अनुवादाच्या आधारे त्या ओळींचे मराठी अनुवाद केलेले आहेत.

